शालेय शिक्षण व क्रीडा विभागात ई-गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रियेची अंमलबजावणी करण्यासाठी गुगल API सर्व्हिसचे देयक अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह-१५२०/प्र.क्र.११/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०३ मार्च, २०२०

वाचा :-

१) आयुक्त, शिक्षण , पुणे यांचे पत्र क्र.आस्था-१४३/आरटीई/२०१९-२०/३१०३, दि.२१.०३.२०१९.
२) प्रकल्प अंमलबजावणी बैठक, दि.२६.१२.२०१९

प्रस्तावना:-

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम १२(१)(सी) नुसार खाजगी विनाअनुदानित शाळांमध्ये प्रवेश स्तरावर २५ टक्के जागा वंचित व दुर्लभ घटकातील मुला/मुलींसाठी भरण्याची प्रवेश प्रक्रिया राज्यात राबविली जाते. सदरील प्रवेश प्रक्रिया अंतराच्या निकषावर आधारीत आहे. त्यामुळे गुगल मॅपची API service घ्यावी लागते. त्याकरिता आयुक्त शिक्षण, पुणे यांनी संदर्भ क्र.१ नुसार प्रस्ताव सादर केला असून, संदर्भ क्र.२ अन्वये गुगल API सर्व्हिस घेण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने ई-गव्हर्नस कार्यक्रमांतर्गत गुगल API सर्व्हिसकरिता निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रियेची अंमलबजावणी करण्यासाठी गुगल API सर्व्हिस घेण्याकरिता रु.७,३३,७००/- (रुपये सात लाख तेहतीस हजार सातशे फक्त) एवढी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक -ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०१९-२० च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य,

पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०३१६५८०४७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.03.03 17:00:41 +05'30'

**(प्रविण मुंढे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
७) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.